महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरिता निर्माण केलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी-१७१९/प्र.क्र.१२९/राऊशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १६ नोव्हेंबर, २०२१.

वाचा : - १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि. २०.०१.२०१४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तीय सुधारणा, दि.२०.०२.२०१६.
३) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दि.२५.९.२०१९.
४) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दि.३१.१०.२०१९.
५) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.इएसटी-१७१९/प्र.क्र.१२९/राउशु-१, दि.२६.११.२०१९.
६) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.३०/सीपीटीपी-ब, दि.०५.१०.२०२१.
७) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०९२१/प्र.क्र.२३/सीपीटीपी-अ, दि.११.१०.२०२१.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील उमेदवारांना यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील उमेदवारांना वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्यानुषंगाने, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१७ व २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रुजू झालेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील अधीक्षक, गट-अ संवर्गातील १, उपअधीक्षक गट-ब संवर्गातील ३ व सहायक आयुक्त, गट-ब संवर्गातील १ अशा एकूण ५ अधिकाऱ्यांकरीता ५ अधिसंख्य पदे, सदर उमेदवार त्या दिवशी कागदपत्र पडताळणीसाठी हजर राहिले त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता निर्माण करण्यास, संदर्भ क्र.५ वरील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहेत. सदर प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांच्या सत्र -३ व ४ च्या परिक्षेचा निकाल जाहीर होऊन त्यांची सेवाज्येष्ठता निश्चित होईपर्यंत काही कालावधी लागणार असल्याने, सदर अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१७ व २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष रुजू झालेल्या राज्य उत्पादन शुल्क विभागातील अधीक्षक, गट-अ, उपअधीक्षक गट-ब व सहायक आयुक्त, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांकरीता संदर्भ क्र.६ वरील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या ५ अधिसंख्य पदांना, सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना विभागीय संवर्ग वाटप होऊन पदस्थापनेची कार्यवाही पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर परिविक्षाधीन अधिकारी सद्य:स्थितीत ज्या ठिकाणी खातेनिहाय जिल्हासंलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहे, त्या ठिकाणी विभागीय संवर्ग वाटप होईपर्यंत कार्यरत राहतील.

३. वित्त विभागाने संदर्भाधीन दि.२०.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११११६१७३९१७८२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandeep Gorakhnath Dhakane

Digitally signed by Sandeep Gorakhnath Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, cn=Sandeep Gorakhnath Dhakane
Date: 2021.11.16 17:43:39 +05'30'

**( संदिप ढाकणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर.
७. कार्यासन क्र. व्यय-८ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रशिक्षण प्रबोधिनी (यशदा), पुणे.
९. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
१०. कक्ष अधिकारी (सीपीटीपी कार्यासन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती.